महाज्ञानदीप पोर्टल तयार करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. : संकीर्ण-२०२५/प्र.क्र.६६/तांशि-२**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १७ एप्रिल, २०२५

संदर्भ

१. सामान्य प्रशासन विभागा पत्र क्रमांक संकीर्ण-२०२४/प्र.क्र.८९/र. व का.१, दिनांक ०३.०१.२०२५.
२. उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्रमांक: एनईपी-२०२२/प्र.क्र.०९/विशि-३/शिकाना, दिनांक २०.०४.२०२३.

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र राज्यामध्ये संदर्भ-२ येथील शासन निर्णयान्वये राष्ट्रीय शैक्षणिक धोरण, २०२० लागू करण्यात आलेले आहे. सदर धोरणाच्या अंमलबजावणी करण्याच्यादृष्टीने सुकाणू समितीच्या सुतोवाचातून "महाज्ञानदीप" या ऑनलाईन व्यवस्थेची संकल्पना या उपक्रमातून प्रत्यक्षात निर्माण करण्यात आली.

"महाज्ञानदीप" ऑनलाईन उपक्रमाचे मुख्य उद्दिष्टे खालीलप्रमाणे आहेः-

- महाराष्ट्राच्या परिप्रेक्षामध्ये उत्तमोत्तम अध्ययन साहित्य, अध्यापन गुणवत्तापूर्ण रितीने सर्व विद्यार्थ्यांना त्यांच्या आवडीच्या व व्यावसायिक गरजेप्रमाणे निवडीच्या विषयांचा अभ्यास सहज सोप्या अध्ययन व्यवस्थापन ऑनलाईन व्यासपीठाद्वारे उपलब्ध करुन देणे .
- महाराष्ट्रातील अध्यापकांचा राष्ट्रीय स्तरावरील या उपक्रमाअंतर्गत अभ्यासक्रम इतरांसाठी उपलब्ध करुन देण्याचा वाटा वाढविणे .
- महाराष्ट्रातील उच्च शिक्षण संस्थांमधील अध्यापकांना ई-आशय निर्मितीचे प्रशिक्षण देऊन त्यांना ई-आशय निर्मितीतज्ञ म्हणून विकसीत करणे.

सदर उपक्रमासाठी यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठाने पुढाकार घेऊन महाराष्ट्रातील सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, मुंबई विद्यापीठ, शिवाजी विद्यापीठ कोल्हापूर, एस.एन.डी.टी. विद्यापीठ मुंबई या विद्यापीठासमवेत उच्च व तंत्र शिक्षण विभागाने सामंजस्य करार करुन महाज्ञानदीपसाठी महासंघ (Consortium) स्थापन करण्यात आला आहे. या महासंघातील सर्व सदस्य विद्यापीठांनी व इतर महाराष्ट्रातील विद्यापीठांनी महास्वयं उपक्रमाचे कामकाज, विद्यापीठांच्या जबाबदाऱ्या, अभ्यासक्रमांचे जागतिक दर्जाचे प्रमाणीकरण, शुल्क रचना, शिक्षकांचे

महास्वयंसाठी ई-अभ्यासक्रम विविध विषयांचे निर्मित करण्याच्या सक्षमतेसाठी प्रशिक्षण, विविध विद्यापीठांच्या सहभागाने पुढील वर्षभराच्या निर्मिती करावयाच्या अभ्यासक्रमाचे नियोजन व भविष्यातील नियोजनाचे कार्य महाज्ञानदीप महासंघ निश्चित करणार येणार असून, याबाबतचे धोरण निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

महाराष्ट्र राज्यामध्ये राष्ट्रीय शैक्षणिक धोरण, २०२० लागू करण्यात आलेले असूव, सदर धोरणाच्या अंमलबजावणी करण्याच्यादृष्टीने सुकाणू समितीच्या सुतोवाचातून निर्माण झालेल्या "महाज्ञानदीप" या ऑनलाईन पोर्टलद्वारे देण्यात येणाऱ्या अभ्यासक्रमास व शिक्षण पध्दतीस या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. सदरहू उपक्रमाची अंमलबजावणी करण्याची कार्यप्रणाली खालीलप्रमाणे असेल:-

### महाज्ञानदीप उपक्रमाची कार्यप्रणाली:-

- महाज्ञानदीप महासंघ ही संपूर्ण नियोजन करणारी व्यवस्था असेल .
- या महासंघाद्वारे तयार करण्यात आलेला अभ्यासक्रम विकसित करतील.
- कोणत्या विद्यापीठाकडे कोणती जबाबदारी द्यावी, अभ्यासक्रमांचे शैक्षणिक आणि तांत्रिक गुणवत्ता मानके काय असावीत, याचे नियोजन महासंघाद्वारे केले जातील .
- यासाठी एक प्रमाणित कार्यपद्धती )Standard Operating Procedure -SOP) तयार करण्यात आली असून ती सर्व सहभागी विद्यापीठांमध्ये वितरित करण्यात येईल.
- विद्यार्थ्यांचा प्रवेश, अध्ययन आणि श्रेयांक स्थानांतरणासाठी एक स्वतंत्र लर्निंग मॅनेजमेंट सिस्टीम )LMS) तयार करण्यात आली आहे .
- या LMS Maharashtra Knowledge Corporation Limited (MKCL) या संस्थेने विकसित केले असून, विद्यार्थ्यांचा अभ्यासक्रमात प्रवेश (Admission), शिक्षणाचा मागोवा (Progress Tracking) आणि श्रेयांक देणे (Credit Award) हे सर्व याच प्लॅटफॉर्मद्वारे सुलभपणे केले जातील.
- या उपक्रमासाठी विद्यापीठांमधील समन्वयक आणि तांत्रिक सल्लागार हे त्यांची भूमिका बजावतील .
- MKCL च्या सहकार्याने LMS प्रणालीची रचना आणि संचालन, विद्यार्थ्यांचा APAR ID चा वापर करून ABC प्रणालीशी श्रेयांक हस्तांतरण, तसेच अध्ययनाचा मागोवा घेणे ही जबाबदारी YCMOU (Yashwantrao Chavan Maharashtra Open University) पार पाडेल .
- अभ्यासक्रम डिझाइन, शैक्षणिक स्क्रिप्ट लेखन, LCM मॉडेलचा वापर, ई आशय-निर्मिती, व्हिडिओ शूटिंग व एडिटिंग यासाठी YCMOU (Yashwantrao Chavan Maharashtra Open University) विविध प्रशिक्षण कार्यक्रम त्याचप्रमाणे अभ्यासक्रमांचे अंतर्गत मूल्यांकन, गुणवता हमी यंत्रणा आणि पोर्टलचे अद्ययावतीकरण व विद्यार्थी सहाय्यसेवा ही जबाबदारी YCMOU (Yashwantrao Chavan Maharashtra Open University) चोखपणे पार पाडेल.

- इतर सहभागी विद्यापीठांची जबाबदारी म्हणजे त्यांच्या अभ्यासक्रम यादीतून विद्यार्थ्यांसाठी उपयुक्त व उद्योन्मुख अभ्यासक्रम निवडणे आणि त्यासाठी अभ्यासक्रम प्रस्ताव तयार करील.
- विषयतज्ञ, शैक्षणिक लेखक, डिझाइनर व AV टीम यांची नियुक्ती करून LCM मॉडेलनुसार LCM LED, LbD, LxT, Lat या चार भागांत विभागलेले अभ्यासक्रम विकसित करणे आणि LMS वर अपलोड करणे.
- सदरहू उपक्रमासाठी समन्वयाची भूमिका पार पाडण्यासाठी प्रत्येक विद्यापीठ एक नोडल अधिकारी नियुक्त करतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४१७२०२२२९३३०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Digitally signed by SANTOSH PUNAMCHAND KHORGADE
Date: 2025.04.17 20:23:33 +05'30'

**( संतोष खोरगडे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२. मा.मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, विधानमंडळ, मुंबई
५. मा.सभापती/उप सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई
६. मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव.
७. मा.राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव.
८. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
९. सर्व प्रशासनिक विभागाचे अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई
१०. कुलगुरु, सर्व विद्यापीठे
११. संचालक, माहिती तंत्रज्ञान, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
१२. संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१३. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
१४. कुलगुरु, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे, ता.मागणगांव, जि.रायगड.
१५. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई (प्रसिध्दीसाठी)
१६. महालेखापाल - १ / २ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
१७. महालेखापाल - १ / २ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर

१८. सर्व संबंधित मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक
१९. उप सचिव (मशि/विशि/अर्थसंकल्प), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
२०. निवडनस्ती/तांशि-२.